राज्यस्तरीय नगरपरिषद संवर्गातील कर्मचाऱ्यांना मुख्याधिकारी गट-ब संवर्गात मर्यादित विभागीय परिक्षेच्या गुणवत्तेनुसार परिविक्षाधीन प्रशिक्षणार्थी मुख्याधिकारी गट-ब पदावर On field Training स्वरुपात नियुक्त्या देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांक : एमसीओ-२०२१/प्र.क्र.८७/नवि-१४**
मुख्य इमारत (४ था मजला), मंत्रालय,
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १० ऑगस्ट, २०२३.

वाचा:- १) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१२/प्र.क्र.१५१/नवि-१४, दि.१५.०५.२०१७
२) नगर विकास विभाग, शासन अधिसूचना क्र.एमसीओ-२०१२/प्र.क्र.१५१/नवि-१४, दि.०६.०३.२०१९.
३) नगरपरिषद प्रशासन संचालनालयाकडील दि.२३.०५.२०२३ रोजीचा प्रस्ताव.

शासन आदेश:-

नगरपरिषद राज्यस्तरीय संवर्ग कर्मचाऱ्यांना मुख्याधिकारी गट-ब संवर्गातील १०% पदांवर मर्यादित विभागीय स्पर्धा परिक्षेद्वारे पदोन्नतीने नियुक्तीची संधी उपलब्ध करुन देण्याबाबतचा धोरणात्मक निर्णय शासनाने संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये घेतला होता.

२. तद्नुषंगाने संदर्भ क्र.२ येथील अधिसूचनेन्वये महाराष्ट्र राज्य नगरपरिषद मुख्याधिकारी सेवा (सेवा भरती व सेवेच्या शर्ती) नियम, सुधारित करण्यात येऊन मुख्याधिकारी, गट-ब मधील १०% पदांवर मर्यादीत विभागीय स्पर्धा परीक्षेद्वारे गुणवत्तेनुसार निवडलेल्या सुयोग्य व्यक्तींना नियुक्तीची तरतूद विहीत करण्यात आली होती.

३. सदर नियमातील तरतूदीनुसार नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत राज्यस्तरीय नगरपरिषद संवर्ग कर्मचाऱ्यांमधून मर्यादित विभागीय स्पर्धा परिक्षेद्वारे गुणवत्तेनुसार निवडलेल्या कर्मचाऱ्यांना नियुक्ती देण्याबाबतचा प्रस्ताव नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने संदर्भ क्र.३ अन्वये सादर केला होता.

४. तद्नुसार, सदर परिक्षेतील अंतिम निकालाव्दारे गुणवत्ताक्रमांकानुसार मुख्याधिकारी गट-ब या संवर्गासाठी निवड झालेल्या खालील उमेदवारांना मुख्याधिकारी गट-ब पदावर प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन मुख्याधिकारी म्हणून On field Training स्वरुपात नियुक्ती देऊन त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.३ येथे दर्शविलेल्या नगरपरिषदा/ नगरपंचायतींमध्ये करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव व पदनाम | परिविक्षाधीन प्रशिक्षणार्थी मुख्याधिकारी पदावर प्रस्तावित पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|
| १. | श्री.शेषराव रामदास चौधरी, महाराष्ट्र नगरपरिषद अभियांत्रिकी (स्थापत्य) सेवा, श्रेणी-ब (गट-क). | मुख्याधिकारी, मनमाड नगरपरिषद, जि.नाशिक. | श्री.सचिनकुमार पटेल यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर. |

५. तसेच, श्री.सचिनकुमार पटेल यांना मुख्याधिकारी, मनमाड नगरपरिषद, जि.नाशिक या सध्याच्या पदावरुन दि.१०.०८.२०२३ (म.नं.) पासून कार्यमुक्त करण्यात येत असून, त्यांच्या नियुक्तीचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

६. उपरोक्त प्रशिक्षणार्थी परीविक्षाधीन मुख्याधिकारी, गट-ब यांनी त्यांना नियुक्ती देण्यात आलेल्या नगरपरिषदेमध्ये तात्काळ रुजू व्हावे. नगरपरिषदेवर नियुक्ती देण्यात आलेल्या परीविक्षाधीन मुख्याधिकारी, गट-ब यांनी संबंधित जिल्हाधिकाऱ्यांकडे त्यांचा रुजू अहवाल सादर करावा. संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांना रुजू करून घ्यावे व नियुक्ती देण्यात आलेल्या ठिकाणी संबंधित परीविक्षाधीन प्रशिक्षणार्थी मुख्याधिकारी हजर झाले आहेत, याची खात्री करून घेऊन, जिल्हा प्रशासन अधिकारी यांनी तसा अनुपालन अहवाल ashok.lakkas@nic.in या ई-मेल पत्त्यावर सादर करावा.

७. संबंधित प्रशिक्षणार्थी परीविक्षाधीन मुख्याधिकारी, गट-ब यांच्या उपरोक्तनुसारची नियुक्ती ही प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन स्वरुपातातील On Field Training स्वरूपात आहेत.

८. संबंधित प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन मुख्याधिकाऱ्यांचे पायाभूत, कार्यानुभवाबाबतचा व अनुषंगिक प्रशिक्षण कार्यक्रम तसेच परिविक्षा कालावधीतील विभागीय परिक्षा आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी निश्चित करावे.

९. उपरोक्त प्रशिक्षणार्थी परीविक्षाधीन मुख्याधिकारी यांना प्रशिक्षण कार्यक्रम पुर्ण करणे व परिक्षा उत्तीर्ण होणे बंधनकारक असेल. याबाबत शासनाच्या प्रचलित सेवा विषयक नियमातील तरतूदी लागू राहतील.

१०. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८१११०१८०१६९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

C PRIYANKA

Digitally signed by C PRIYANKA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae44359c483f3e1b0d4450728d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=55FDD77FA8877B50FD182206F763C590C30CE698809F79D37B145FD63E375059, cn=C PRIYANKA
Date: 2023.08.11 11:10:32 +05'30'

**( प्रियांका कुलकर्णी-छापवाले )**
**शासनाच्या उप सचिव**

**प्रति,**

१. आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, वरळी,मुंबई.
२. सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक.
३. संबंधित जिल्हाधिकारी,
४. संबंधित नगरपरिषदेचे नगराध्यक्ष.
५. संबंधित मुख्याधिकारी.
६. श्री.शेषराव रामदास चौधरी, परीविक्षाधीन मुख्याधिकारी, गट-ब

**प्रतिलिपी,**

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उप मुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व सह/उप सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. निवडनस्ती/नवि-१४.